राज्य योजना सन २०१७-१८
**डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६ ८७११) निधी वितरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५१७/प्र.क्र. १४८/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०६ जुलै, २०१७.

**वाचा :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५.१५/प्र.क्र.१५५/फ-१, दिनांक ०४.०८.२०१५.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०५१७/प्र.क्र. १४८/फ-१, दिनांक ३१.०५.२०१७
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२२(६)/ योजना/ प्र.क्र.३३/७९९/१७-१८, नागपूर दिनांक १३.०६.२०१७.
५. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/यो/इए/नबाप्र/ प्र.क्र. १० (१५-१६)/५२९/१७-१८, दिनांक :- १३.०६.२०१७.

**प्रस्तावना :-**

वनालगतच्या गावातील लोकांचा वनव्यवस्थापनासाठी सहभाग मिळावा, त्यांचे वनावरील अवलंबन कमी करून वनांवरील पर्यायाने वन्यजीवांवरील ताण कमी करणे यासाठी या योजनेत संयुक्त वन व्यवस्थापन समिती/ग्राम परिसर विकास समिती मार्फत "ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम "ही योजना राबवली जात आहे. राज्यात एकूण ६ राष्ट्रीय उद्याने व ४८ अभयारण्ये आहेत. त्यापैकी ५ राष्ट्रीय उद्याने आणि १४ अभयारण्यांचे क्षेत्रावर ६ व्याघ्र प्रकल्प घोषित करण्यात आले आहेत. व्याघ्र प्रकल्पाच्या बफर क्षेत्रात तसेच अभयारण्यांच्या लगतच्या क्षेत्रातील गावात मानव-वन्यप्राणी संघर्ष कमी करण्याच्या दृष्टीने तसेच ग्रामस्थांचा वन्यजीव संरक्षणात सक्रिय सहभाग वाढावा ह्या दृष्टीने "डॉ . श्यामाप्रसाद मुखर्जी जन वन विकास योजना" संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात आली आहे.

२. सन २०१७-१८ राज्यस्तरीय योजनेतंर्गत डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६ ८७११) या लेखाशिर्षातंर्गत रुपये १००००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये उक्त योजनकरीता रु. ८४५.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे. संदर्भ क्रमांक ५ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सन २०१७-१८ मध्ये उपरोक्त योजनांतर्गत नव्याने निवडलेल्या १६६ गावांमध्ये विहीरीना कठडे बांधणे, पाणवठे तयार करणे, लाभार्थांना एलपीजी गॅस पुरवठा करणे, बायोगॅस पुरवठा करणे, सूर्यचूल उपलब्ध करुन देणे, ग्रामीणांना प्रशिक्षण देणे, रोजगारांच्या संधी उपलब्ध करुन देणे, शौचालय बांधणे, दुधाळ / संकरीत

जनावरांचे वाटप, वैरण विकास, स्टॉल फिडींग, जनावरांना लसीकरण, पाणलोट विकास, जल-मृदा संधारण सिंचन तालावची निर्मिती, इतर जलसाठे निर्माण करणे, मानव-वन्यजीव संघर्ष कमी करणे, अपारंपारीक ऊर्जा स्त्रोतांच्या वापरास चालना देणे, कृषी संसाधनाचा विकास करणे इत्यादी त्याकरीता रु. ४१५०.०० लक्षचा प्रस्ताव सादर केलेला आहे. वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रक क्रमांक २ अन्वये सन २०१७-१८ करीता योजनेअंतर्गत डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६ ८७११) मधील विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ८० % मर्यादेत निधी माहे डिसेंबर, २०१७ पर्यत खर्च करण्यास **" अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही "** या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

## शासन निर्णय :-

अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ५ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाप्रमाणे सदर शासन निर्णयान्वये रु. ४१५०.०० लक्ष निधी व्याघ्र प्रकल्पाच्या बफर क्षेत्रात तसेच अभयारण्यांच्या लगतच्या क्षेत्रातील गावात डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन वन विकास योजनेकरीता खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१७-१८ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२, पर्यावरणीय वनिकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संरक्षण, (००) (१८) डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११)अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

२. सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ व वन ( संवर्धन ) अधिनियम १९८० चा भंग होणार नाही ह्याची दक्षता घ्यावी.

३. गाववार निधी वाटप करतेवेळी मंजूर आराखड्यानुसार निधीची आवशकता विचारात घ्यावी.

४. सदर योजनेंतर्गत निवडलेल्या गावांच्या मंजूर सूक्ष्म आराखड्यात नमूद कार्यबाबीनुसारच सदरची कामे करण्यात यावीत.

५. योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

६. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

७. प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची जबाबदारी संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी

यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

८. सदर योजनेच्या अनुषंगाने शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी-०५१५/प्र.क्र.१५५/फ-१, दिनांक ०४.०८.२०१५ अन्वये जारी करण्यात आलेल्या निर्देशानुसार कार्यवाही करण्यात यावी.

९. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक :- १७.०४.२०१५ व क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०६१७४७३७०११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2017.07.06 17:49:12 +05'30'

(स्वप्निल देशभ्रतार)
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
६. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
७. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
८. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती.
९. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
१०. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, संह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.
११. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगांव नागझिरा, व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
१२. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
१३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*******